**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागातील सर्व अधिनस्त कार्यालयांकरीता संगणक/प्रिंटर्स खरेदी खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: रॉकेल-२०१९/प्र.क्र.१३७/नापु-२७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक:- २६ जून, २०२३

**संदर्भ:-**

१) शासन निर्णय वित्त विभाग क्र.: विअप्र-२०१३/प्र.क. ३०/२०१३ -विनियम,दि.१७.०४.२०१५
२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.भांखस-२०१४/प्र.क.८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१.१२.२०१६
३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.भांखस-२०१४/प्र.क.२०४/भाग-III/उद्योग-४, दि.०८.१२.२०१७
४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.भांखस-२०१४/प्र.क.२०४/भाग-III/उद्योग-४, दि.२४.०८.२०१७
५) केंद्र शासन पत्र दि. ०८.०५.२०१९
६) केंद्र शासन पत्र दि.२९.०९.२०२०
७) उच्चाधिकार समितीच्या दि.१४.०२.२०२० रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाच्या DBTK (Direct Benefit transfer in Kerosene) प्रकल्पांतर्गत राज्य शासनाने माहे ऑक्टोबर ते डिसेंबर, २०१८ या तिमाहीपासून राज्याच्या तिमाही केरोसिन नियतनात स्वैच्छीक कपात केली होती. परिणामी, DBTK (Direct Benefit transfer in Kerosene) प्रकल्पात नमूद केल्यानुसार केंद्र शासनाने राज्य शासनास केरोसिन नियतनात केलेल्या स्वैच्छीक कपातीबद्दल दोन टप्प्यात, पहिल्या टप्प्यात रु.१६,०९,८८,६४०/-(रु.सोळा कोटी नऊ लक्ष अठ्ठयाऐंशी हजार सहाशे चाळीस) आर्थिक लाभ दि.०८.०५.२०१९ च्या पत्रान्वये (Cash Incentive) मंजूर केला आहे. तसेच रु.३६,१९,१०,०३०/-(रु. छत्तीस कोटी एकोणीस लक्ष दहा हजार तीस) इतका प्रोत्साहन पर आर्थिक लाभ (Cash Incentive for Kerosene Distribution Reform) दि.२९.०९.२०२० रोजीच्या पत्रान्वये मंजूर केला आहे. असा एकूण रु. ५२,२८,९८,६७०/- (रु.बावण्ण कोटी अठ्ठावीस लक्ष अठ्ठयाण्यव हजार सहाशे सत्तर) इतका प्रोत्साहन पर आर्थिक लाभ राज्य शासनास मंजूर केला आहे. सदर निधीपैकी आवश्यक निधीतून राज्यात सार्वजनिक वितरण व्यवस्थेचे संगणकीकरण करण्याकरिता व विभागाचे End to End Computerization करण्याकरिता खुद्द विभागास व सर्व क्षेत्रिय कार्यालयांना संगणक, प्रिंटर्स व तदनुषंगिक साहित्यसामुग्री (Anti-virus, Microsoft office ) उपलब्ध करुन देण्याकरिता GeM (Government e-Marketplace) पोर्टलवरून ऑनलाईन पद्धतीने खरेदी करावयाची असून सदर खरेदीकरीता रू. १४.४० कोटी इतक्या खर्चास उच्चाधिकार समितीने

दि.१४.०२.२०२० रोजीच्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. तसेच माहिती व तंत्रज्ञान विभागाने सदर संगणक साहित्याच्या तांत्रिक विनिर्देशास (Technical Specifications) मान्यता दिलेली आहे. सबब, एकूण १४६५ नवीन संगणक व ७३६ नवीन प्रिंटर्स खरेदी करण्याकरीता वित्तीय वर्ष २०२३-२४ मध्ये २४०८०६१८-१७ संगणक खर्च या लेखाशिर्षाखाली रू.१४.४० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करून घेण्यात आला आहे. त्यानुषंगाने सदर खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णयः-**

राज्यात सार्वजनिक वितरण व्यवस्थेचे संगणकीकरण करण्याकरिता व विभागाचे End to End Computerization करण्याकरिता खुद्द विभागास व सर्व क्षेत्रिय कार्यालयांना संगणक, प्रिंटर्स व तदनुषंगिक साहित्यसामुग्री (Anti-virus, Microsoft office) उपलब्ध करुन देण्याकरिता GeM (Government e-Marketplace) पोर्टलवरून ऑनलाईन पद्धतीने खरेदी करावयाची आहे. सदर खरेदीकरीता खालील तक्त्यात नमुद केल्यानुसार रु.१४.४० कोटी (रु.चौदा कोटी चाळीस लक्ष फक्त) इतक्या अंदाजित खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | साहित्य | नग | प्रति नग अंदाजित किंमत | एकूण अंदाजित किंमत |
|---|---|---|---|---|
| १ | संगणक (Desktop) | १४६५ | ६८,७९८/- | १०,०७,८९,०७०/- |
| २ | प्रिंटर्स | ७३६ | १४,०९९/- | १,०३,७६,८६४/- |
| ३ | ५ वर्षाकरीता Anti-Virus | १४६५ | २०००/- | २९,३०,०००/- |
| ४ | MS-Office | १४६५ | २०,३६५/- | २,९८,३४,७२५/- |
| **एकूण** | | | **१,०५,२६२** | **१४,३९,३०,६५९/-** |

२. यासंदर्भातील अटी व शर्ती खालीलप्रमाणे आहेत:-

I. उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. भासंख-२०१४/प्र.क्र. ८२/भाग-३/ उद्योग-४, दि.०१.१२.२०१६ व त्या विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णयान्वये शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपद्धतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील अटी व शर्ती आणि तरतूदीनुसार, काटेकोरपणे पालन करुन, विहीत पद्धतीने संगणक खरेदी प्रक्रिया राबविण्यात येईल. तसेच संगणक/प्रिंटर्स खरेदी संदर्भात माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या सूचनांचे व शासनाच्या विहित केलेल्या कार्यपद्धतीचे पालन करण्यात येईल.

II. उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय दि. २४.०८.२०१७ अन्वये दिलेल्या अटींच्या व शर्तीच्या अनुषंगाने GEM पोर्टलच्या माध्यमातून संगणक/प्रिंटर खरेदी प्रक्रिया करण्यात येईल. तथापि, सदर साहित्य खरेदी ही मोठया प्रमाणावरील असल्याने तसेच त्याचा वापर क्षेत्रिय स्तरावर

होणार आहे. सबब, त्यासंदर्भातील सर्वसमावेशक अटी व शर्तीसह खरेदी प्रक्रिया करणे आवश्यक आहे. त्यामुळे यासंदर्भातील R.F.P. मधील अटी व शर्ती GEM पोर्टलवर प्रसिद्ध करण्यात येईल.

III. संगणक/प्रिंटर्स यांची खरेदी माहिती व तंत्रज्ञान विभागाने मान्यता दिलेल्या तांत्रिक विनिर्देश (Technical Specifications) नुसार करण्यात येईल.

IV. प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित संगणक/प्रिंटरचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे निविदा प्रक्रीयेअंती दर निश्चित करण्यात येतील. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत व संबंधित पुरवठादाराने या बाबींचा इतर ठिकाणी त्याच कालावधीत ज्या दराने पुरवठा केला त्या दरापेक्षा जास्त नसल्याची खातरजमा करण्यात येईल.

V. खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यावर त्यांची साठवणूक व वितरण करणे तसेच सदर संगणक/प्रिंटर विनावापर पडून राहणार नाही व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल याची दक्षता सर्व संबंधित क्षेत्रिय कार्यालयांनी घ्यावी.

VI. संगणक वॉरंटी कालावधी ५ वर्षे इतका आहे. सदर ५ वर्षाच्या वॉरंटी कालावधीमध्ये संगणक दुरुस्ती देखभालीची जबाबदारी कंपनीची राहील. साहित्याची नोंद जडवस्तूसंग्रहात घेण्यात यावी. तसेच विहीत पद्धतीने जुन्या संगणक साहित्याचे निर्लेखन करण्यात यावे.

३. सदर संगणक व प्रिंटर्स खरेदी करण्याकरीता होणारा खर्च "मागणी क्र. एम-२, लेखाशिर्ष क्र.२४०८०६१८,(०३) (१७) पात्र शिधापत्रिकाधारकांना केरोसीनसाठी अर्थसाहाय्य (कें.पु.यो) (अनिवार्य) २४०८०६१८-१७ संगणक खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात मंजूर झालेल्या अनुदानातुन भागविण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर खरेदी दि.१४.०२.२०२० रोजीच्या उच्चाधिकार समितीच्या मान्यतेनुसार करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६२६१६१२२५२५०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TATOBA MARUTI KOLEKAR

Digitally signed by TATOBA MARUTI KOLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=f6809ddecc0e0507860e37e9935ab3a7013510f4fe04fad27512588a0bc8e15f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9915405908628D01955F3675ACC122F51E0C39F63F7CC88EEC49CD05616991FD, cn=TATOBA MARUTI KOLEKAR
Date: 2023.06.26 16:14:58 +05'30'

**( तातोबा कोळेकर )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

२) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ महाराष्ट्र/२ मुंबई/नागपूर,
४) महालेखापाल (लेखा परीक्षा)- १ महाराष्ट्र/२ मुंबई/नागपूर,
५) मा.मंत्री (अ.ना.पु.व ग्रा.स.) यांचे खाजगी सचिव,
६) सचिव (अ.ना.पु.व ग्रा.स.वि.) यांचे स्वीय सहायक,
७) रोखशाखा, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
८) निवडनस्ती (कार्यासन नापु २७).